२०१०१००४१८५४२४००१

पिंपरी-चिंचवड महानगरपालिका
कार्यकारी अभियंता (पर्यावरण) तथा पर्यावरण संवर्धन अधिकारी या अभिनामाचे एक पद नव्याने निर्माण करण्याबाबत

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग,
शासन निर्णय क्र.पीसीसी-३०१०/प्रक्र-१७६/२०१०/नवि-२२
मंत्रालय, मुंबई- ४०००३२,
दिनांक: ०१ ऑक्टोबर,२०१०

वाचा : १) आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र. प्रशा/ १अ/ कावि/ ३३८/ २०१०,दिनांक २७.४.२०१० व त्यासोबतचा महासभा ठराव क्र.७४५, दि.२१.१२.०९ आणि परिशिष्ट - अ

२) सहाय्यकआयुक्त, पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र. प्रशा/१ अ/कावि/४१२/ २०१०, दिनांक १९.५.२०१०

३) सहाय्यक आयुक्त, पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र. प्रशा/१ अ/कावि/४००/ २०१०, दिनांक २४.५.२०१० व त्यासोबतचे आरोग्य वैद्यकिय अधिकारी ,पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.वैदय/१ अ/ कावि/४२४/२०१०, दिनांक १५.५.२०१०

४) या विभागाचा शासन निर्णय क्र.संकीर्ण १००५/वर्गीकरण/प्र.क्र.३७९/०५/ नवि-२४,दि.४.५.२००६

प्रस्तावना:-

आयुक्त, पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका यांनी महासभा ठराव क्र.७४५, दि.२१.१२.२००९ विचारात घेवून, पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिकेच्या आस्थापनेवर आरोग्य वैद्यकिय विभागाकरिता " कार्यकारी अभियंता (पर्यावरण) तथा पर्यावरण संवर्धन अधिकारी" या अभिनामाचे पद नव्याने निर्माण करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावात त्यांनी नमूद केले आहे की,पिंपरी चिंचवड शहर हे औद्योगिक शहर म्हणून ओळखले जाते. पिंपरी चिंचवड शहराचा विकास औद्योगिकरणामुळे व शहरीकरणामुळे (Industrialisation & Urbanization ) इतर शहरांच्या तुलनेत अतिशय वेगाने होत आहे. या शहरात सद्य:स्थितीत लहान मोठया सुमारे १५० कंपन्यांचा समावेश आहे. शहराचे वाढते औद्योगिकरण व शहरीकरण लक्षात घेता भविष्यात पर्यावरण संवर्धन व संरक्षणासाठी स्वतंत्र यंत्रणा महानगरपालिकेमध्ये निर्माण करणे आवश्यक आहे. मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ चे कलम ६७ (अ), प्रतिवर्षी शहराचा पर्यावरण विषयक अहवाल, त्याचप्रमाणे शहरातील जलप्रदुषण, जमिन प्रदुषण, ध्वनी प्रदुषण व वायु प्रदुषण विषयी अहवाल तयार करणे आवश्यक आहे.

भारतीय संविधानाची ७४वी घटना दुरुस्तीनुसार पर्यावरण संरक्षणासाठी विशेष प्राधान्य दिले आहे. त्या अंतर्गत केंद्रीय प्रदुषण नियंत्रण बोर्ड तसेच महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण बोर्ड (MPCB) यांचेतर्फे पर्यावरण संरक्षणाचे विशेष नियंत्रण ठेवले जाते. पिंपरी-चिंचवड शहराचे

वाढते औद्योगिकरण व शहरीकरण लक्षात घेता शहरातील पर्यावरण संरक्षण, नियंत्रण व संवर्धनासाठी आवश्यक ती यंत्रणा कार्यान्वित करण्यासाठी महानगरपालिकेने स्वतंत्र "पर्यावरण अभियांत्रिकी कक्षाची" स्थापना केलेली आहे. सदर कक्षाचे कामकाज कार्यक्षमतेने पार पाडण्याकरिता महानगरपालिकेस सक्षम अधिकाऱ्याची आवश्यकता आहे. या विभागाचे दिनांक ४.५.२००६ च्या शासन निर्णयानुसार महानगरपालिकेच्या सेवांचे वर्गीकरण करणेत येऊन ३८ पदांचे सेवांचा आकृतीबंध निश्चित करण्यात आला आहे. त्यामधील परिशिष्ट २ मध्ये "पर्यावरण संवर्धन अधिकारी" हे पद दर्शविणेत आले आहे. याबाबी विचारात घेवून पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेच्या आस्थापनेवर "कार्यकारी अभियंता (पर्यावरण) तथा पर्यावरण संवर्धन अधिकारी" या अभिनामाचे पद निर्माण करणेस महापालिका सभेने मंजूरी दिली आहे. सदर पदाची शैक्षणिक पात्रता व अर्हता खालीलप्रमाणे प्रस्तावित केली आहे.

१) स्थापत्य अभियांत्रिकी शाखेतील मान्यता प्राप्त विद्यापिठाची पदवी (B.E.Civil) व पर्यावरण अभियांत्रिकी मधील मान्यताप्राप्त विद्यापीठाची पदव्युत्तर पदवी (M.E.Environment) असणे आवश्यक.

२) उपअभियंता (स्थापत्य) या पदाचा कमीत कमी ३ ते ५ वर्षाचा अनुभव असणे आवश्यक.

३) भरतीचे प्रमाण/पध्दती :- १००% पदोन्नतीने

पिंपरी चिंचवड शहर या महापालिकेचा सन २००८-०९ चा आस्थापना खर्च १९.६९% आहे. तरी महानगरपालिकेच्या आरोग्य वैद्यकिय विभागाकरिता "कार्यकारी अभियंता(पर्यावरण) तथा पर्यावरण संवर्धन अधिकारी" गट "अ" अभिनामाचे वेतनबँड पीबी रु.१५६००-३९१०० व ग्रेड वेतन रु.६६०० या वेतन रचनेतील १ पद मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ चे कलम ५१(४) नुसार मंजूर करणेत यावे. तसेच कलम ४५७ (३) नुसार या पदाची शैक्षणिक अर्हतेस मंजूरी देणेत यावी, अशी विनंती आयुक्त, पिंपरी - चिंचवड शहर महानगरपालिका यांनी सदर प्रस्ताव शासनास सादर करताना केलेली आहे. सबब, आयुक्त, पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिका, यांनी सादर केलेल्या सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिका महासभा ठराव क्र.७४५, दि.२१.१२.२००९ ला अनुसरुन आयुक्तांनी सादर केलेल्या प्रस्तावातील तपशिल या विभागाचा दि.४.५.२००६ रोजीचा शासन निर्णय महानगरपालिका आस्थापना खर्च आणि मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ मधील कलम ६७ (अ) मधील तरतुद पाहता महानगरपालिकेने निर्माण केलेल्या स्वतंत्र "पर्यावरण अभियांत्रिकी कक्ष" याची रचना स्वरुप, कार्ये आणि उद्देश विचारात घेवून, पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिकेच्या आस्थापनेवर "कार्यकारी अभियंता (पर्यावरण) तथा पर्यावरण संवर्धन अधिकारी " (गट अ) या अभिनामाचे,वेतन बँड पीबी-३ रु.१५६००- ३९१०० व ग्रेड वेतन रु ६६०० या वेतनसंरचनेतील एक पद नव्याने निर्माण करण्यास मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ च्या कलम ५१(४) आणि ४५७ (३) अन्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

०२. या पदाची शैक्षणिक अर्हता व पात्रता पुढीलप्रमाणे राहील.

१) स्थापत्य अभियांत्रिकी शाखेतील मान्यता प्राप्त विद्यापिठाची पदवी (B.E.Civil) व पर्यावरण अभियांत्रिकी मधील मान्यताप्राप्त विद्यापीठाची पदव्युत्तर पदवी (M.E.Environment) असणे आवश्यक.

२) उपअभियंता (स्थापत्य) या पदाचा कमीत कमी ३ वर्षाचा अनुभव आवश्यक.

३) भरतीचे प्रमाण/पध्दती :- १००% पदोन्नतीने

०३. या आदेशाच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने सर्व बाबीची पूर्तता आयुक्त, पिंपरी - चिंचवड शहर महानगरपालिका यांनी तात्काळ करावी व अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

(सुनिल कोठेकर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा. राज्यपालांचे सचिव,राजभवन, मलबार हिल,मुंबई
२) मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३) मा.राज्यमंत्री (नवि), मंत्रालय,मुंबई
४) मा.सचिव (२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५) आयुक्त, पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिका, पिंपरी, पुणे
६) शहर अभियंता, पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिका, पिंपरी, पुणे
७) सहायक आयुक्त(प्रशासन), पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिका, पिंपरी, पुणे
८) आरोग्य वैद्यकिय अधिकारी, पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिका, पिंपरी, पुणे
९) कक्ष अधिकारी, (संगणक शाखा), नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
१०) निवडनस्ती (नवि-२२ ), नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२